आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षांसाठी राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत.
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१० ई ४५५)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४ /प्र.क्र.०५/कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १२ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४ व दि.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.५.०७.२०२४.
२) केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाचे आदेश क्र.T-13020/01/2022/-IMM(003), Dt.14.05.2024.
३) आदिवासी विकास विभाग, शा.नि.क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.०५/कार्या-६, दि.१६.०५.२०२४ व दि.२१.०६.२०२४.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, नस्ती क्र.बीयुडी-१३२४/प्र.क्र. २१९/आरोग्य-७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी Kind Grant साठी केंद्र हिस्साचा रु.८६५.२८ लाख इतका निधी प्राप्त झाला आहे. त्यास अनुसरुन समरुप राज्य हिश्श्यासाठी रु.५७६.८५ लाख इतका निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरीत करण्याबाबत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींतून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या योजनेंतर्गत Kind Grant साठी राज्य हिश्श्यासाठी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व राज्य हिस्सा | बाब | सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा. नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान | २२१० ई४५५ (राज्य हिस्सा ४०%) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १५९२८.३८ (रु.१३६८१.४३ मुळ अर्थसंकल्पीत + रु.२२४६.९५ पुरवणी मागणीद्वारे मंजुर) | ८२०८.८६ | ५७६.८५ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.५७६.८५ लाख (अक्षरी रुपये पाच कोटी शहात्तर लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. प्रकरणी विभागप्रमुख/नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.६९९/व्यय-१४, दि.०१.०८.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१०२७०४२९२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.08.12 11:18:20 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
१०) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन अधिकारी (का-८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग.